**<u>यशवंत पंचायत राज अभियान २०१०-२०११</u>**
**राज्यातील अत्युत्कृष्ट जिल्हा परिषदा,**
**पंचायत समित्या व ग्रामपंचायतीसाठी**
**पुरस्कार योजना.**

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग
**शासन निर्णय क्र. झेडपीए २०१०/प्र.क्र.१६१/पंरा-१**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
**दिनांक : ९९ ऑक्टोबर, २०१०.**

**वाचा:-** शासन निर्णय क्रमांक : झेडपीए १००९/प्र.क्र.१३७/पंरा-१,
दिनांक १८ जानेवारी, २०१०.

**<u>प्रस्तावना :</u>**

ग्रामीण महाराष्ट्राच्या विकासामध्ये पंचायत राज संस्थांचे योगदान मोठे आहे. राज्यामधील विकासाच्या सर्व योजना पंचायत राज संस्थांमार्फत राबविल्या जातात. तेव्हा पंचायत राज संस्थांच्या कामगिरीनुसार त्यांना प्रोत्साहित करुन त्यांची कार्यसंस्कृती वाढविणे आवश्यक आहे. यासाठी राज्यात पंचायत राज संस्थांमधून प्रशासकीय व्यवस्थापन व विकास कार्यात उत्कृष्ट काम करणा-या जिल्हा परिषदा, पंचायत समित्या व ग्रामपंचायतीसाठी सन २००५-२००६ या आर्थिक वर्षापासून विभाग व राज्य अशा दोन्ही स्तरांवर अभिनव पुरस्कार योजना सुरु करण्यात आली असून ही योजना यापुढे कायमस्वरुपी राबविण्यात येणार आहे.

**<u>शासन निर्णय</u>** :

राज्यातील पंचायत राज संस्थांतील प्रशासकीय व्यवस्थापन व विकास कार्यात उत्कृष्ट काम करणा-या जिल्हा परिषदा, पंचायत समित्या व ग्रामपंचायतींसाठी सन २००५-२००६ या आर्थिक वर्षापासून विभाग व राज्यस्तर अशा दोन स्तरांवर अभिनव पुरस्कार योजना सुरु करण्यात आली आहे.

पंचायत राज संस्थांची पुरस्कारासाठी निवड करताना पुरस्काराचे स्वरुप, पुरस्कारासाठी पात्र संस्था, पुरस्कारासाठी विविध स्तरावर विचारात घ्यावयाच्या बाबी व मूल्यांकन पध्दती खालीलप्रमाणे निश्चित करण्यात येत आहेत.

**पुरस्काराचे स्वरुप :** राज्यातील अत्युत्कृष्ट तीन जिल्हा परिषदा, तीन पंचायत समित्या व तीन ग्रामपंचायतींना राज्यस्तरावर तसेच तीन पंचायत समित्या व तीन ग्रामपंचायतींना विभागस्तरावर पुरस्कार देण्यात येतील.

**अ) राज्यस्तर पुरस्कार :**

| | | |
|---|---|---|
| **जिल्हा परिषदा :-** | १. प्रथम पारितोषिक - | रु. २५,००,०००/- रोख रक्कम स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| | २. द्वितीय पारितोषिक - | रु. १५,००,०००/- रोख रक्कम स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| | ३. तृतीय पारितोषिक - | रु. १०,००,०००/- रोख रक्कम स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| **पंचायत समिती :-** | १. प्रथम पारितोषिक - | रु. १५,००,०००/- रोख रक्कम स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |

| | | |
|---|---|---|
| | २. द्वितीय पारितोषिक- | रु. १२,००,०००/- रोख रक्कम स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| | ३. तृतीय पारितोषिक | रु. १०,००,०००/- रोख रक्कम स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| **ग्रामपंचायती :-** | १. प्रथम पारितोषिक - | रु.७,००,०००/- रोख रक्कम स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| | २. द्वितीय पारितोषिक - | रु.५,००,०००/- रोख रक्कम स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| | ३. तृतीय पारितोषिक - | रु.३,००,०००/- रोख रक्कम स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |

**ब) विभागस्तर पुरस्कार :**

| | | |
|---|---|---|
| **पंचायत समिती** :- | १. प्रथम पारितोषिक - | रु.१०,००,०००/- रोख रक्कम स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| | २. द्वितीय पारितोषिक - | रु.७,००,०००/- रोख रक्कम स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| | ३. तृतीय पारितोषिक - | रु. ५,००,०००/- रोख रक्कम स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| **ग्रामपंचायती :-** | १. प्रथम पारितोषिक - | रु. ३,००,०००/- रोख रक्कम स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| | २. द्वितीय पारितोषिक - | रु. २,००,०००/- रोख रक्कम स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| | ३. तृतीय पारितोषिक - | रु. १,००,०००/- रोख रक्कम स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |

वर नमूद केल्याप्रमाणे जिल्हा परिषदा, पंचायत समित्या व ग्रामपंचायती यांना देण्यात येणाऱ्या पारितोषिकांची एकूण रक्कम रु.२७०.०० लाख व पुरस्कार वितरणाच्या कार्यक्रमासाठी रु. २१.०० लाख असे एकूण रु.२९१.०० लक्ष ची तरतूद सन २०१०-२०११ च्या अर्थसंकल्पीय अंदाजपत्रकात करण्यात येत आहे. विभागस्तरावर पहिले पारितोषिक मिळवणाऱ्या त्या त्या विभागातील फक्त एकच ग्रामपंचायत आणि पंचायत समिती राज्यस्तरावर होणाऱ्या स्पर्धेसाठी पात्र राहतील.

**जिल्हा परिषदा (परिशिष्ट-अ), पंचायत समिती (परिशिष्ट-ब) व ग्रामपंचायती (परिशिष्ट-क) याप्रमाणे मूल्यमापनाचे निकष व मुद्दे यांच्या प्रती सोबत जोडल्या आहेत.**

**जिल्हा स्तर :** जिल्हास्तरीय पारितोषिक निवड समितीची संरचना पुढीलप्रमाणे असेल.

| | |
|---|---|
| १. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद | अध्यक्ष |
| २. अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी | सह अध्यक्ष |
| ३. प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा | सदस्य |
| ४. उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत) | सदस्य |
| ५. उप मुख्य कार्यकारी अधिकारी (महिला व बालकल्याण) | सदस्य |
| ६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी नियुक्त केलेले दोन गट विकास अधिकारी. | सदस्य |
| ७. उप मुख्य कार्यकारी अधिकारी (प्रशासन) | सदस्य सचिव |

जिल्हा स्तरावरील पारितोषिक निवड समिती जिल्हयातील सर्व ग्रामपंचायतीच्या व पंचायत समित्यांच्या **सन २००९-२०१० या वर्षातील कामकाज व प्रगतीबाबत विहित मूल्यांकन पध्दतीनुसार** ग्रामपंचायतींची प्रथम, द्वितीय व तृतीय व पंचायत समित्यांची प्रथम, द्वितीय व तृतीय याप्रमाणे निवड करुन निवडीच्या समर्थनार्थ अहवालासह विभाग स्तरावरील पारितोषिक निवड समितीकडे प्रस्ताव पाठवेल. तसेच जिल्हा परिषदेच्या कामकाजाबाबत परिपूर्ण व बिनचूक अहवाल विभागीय आयुक्त कार्यालयास सादर करतील.

**विभाग स्तर :** विभागस्तरीय पारितोषिक निवड समितीची संरचना पुढीलप्रमाणे असेल.

| | |
|---|---|
| १. विभागीय आयुक्त - | अध्यक्ष |
| २. उप आयुक्त (आस्था) - | सदस्य |
| ३. मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद (विभागातील - १) (विभागीय आयुक्तांनी नियुक्त केलेले) | सदस्य |
| ४. अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (विभागातील - १ ) (विभागीय आयुक्तांनी नियुक्त केलेले) | सदस्य |
| ५. उप आयुक्त (विकास ) | सदस्य सचिव |

विभाग स्तरावरील पारितोषिक निवड समिती विभागातील सर्व जिल्हास्तरीय पारितोषिक निवड समित्यांकडून प्राप्त झालेल्या निवड प्रस्तावावर अभ्यास करील व जिल्हा समितीने निवडलेल्या ग्रामपंचायती व पंचायत समित्यांमधून विभागातून प्रथम, द्वितीय व तृतीय पुरस्कारासाठी तीन ग्रामपंचायती व तीन पंचायत समित्यांची शिफारस राज्य समितीकडे करेल. त्याचप्रमाणे विभागातील सर्व जिल्हा परिषदांच्या कामकाज व प्रगतीबाबत विहित मूल्यांकन पध्दतीनुसार प्रथम क्रमांकाच्या जिल्हा परिषदेची निवड करुन निवडीच्या समर्थनार्थ सविस्तर अहवालासह राज्यस्तरावरील पारितोषिक निवड समितीकडे प्रस्तावित करील.

**राज्यस्तर :** राज्यस्तरीय पारितोषिक निवड समितीची संरचना पुढीलप्रमाणे असेल.

| | |
|---|---|
| १. सचिव (ग्राम विकास) | अध्यक्ष |
| २. सचिव (जलसंधारण) | सह अध्यक्ष |
| ३. उप सचिव (स्व.ग्रा.स्व.यो.) | सदस्य |
| ४. उप सचिव (जलसंधारण) | सदस्य |
| ५. उप सचिव (माहिती व तंत्रज्ञान) सामान्य प्रशासन विभाग | सदस्य |
| ६.उप सचिव (पंचायत राज) | सदस्य सचिव |

**पंचायत राज संस्था मूल्यमापनासाठी सूचना :**

१) पंचायत राज संस्थेचे **मूल्यमापन सन २००९-२०१० या वर्षातील उद्दिष्ट व साध्याच्या आधारावर करावयाचे आहे.**

२) **ग्रामपंचायत, पंचायत समिती व जिल्हा परिषद यांच्या मूल्यमापनासाठी एकूण १०० गुण आहेत.**

३) मूल्यमापन करताना बहुतांश मुद्यांमध्ये संबंधित योजनेतील कामाच्या प्रगतीच्या टक्केवारीच्या स्वरुपात गुण देणे अपेक्षित आहे. या अनुषंगाने वस्तुनिष्ठ पध्दतीने त्या मुद्याला गुण देय ठरतील.

४) काही मुद्यांसाठी विहित केलेल्या कमाल गुणांपैकी त्या योजनेतील साध्याच्या टक्केवारीच्या प्रमाणातच गुण अनुज्ञेय राहतील.

५) काही मुद्यांबाबत "होय" या स्वरुपात माहिती अपेक्षित आहे. अशा मुद्यांबाबत संबंधित ग्रामपंचायत, पंचायत समिती व जिल्हा परिषद यांचे उत्तर "नाही" असल्यास या मुद्यांसाठी शून्य गुण मिळतील.

६) काही मुद्यांबाबत "नाही" या स्वरुपात माहिती अपेक्षित आहे. अशा मुद्यांबाबत संबंधित ग्रामपंचायत, पंचायत समिती व जिल्हा परिषद यांचे उत्तर "होय" असल्यास या मुद्यांसाठी शून्य गुण मिळतील. **याबाबत कोणतेही तारतम्य (Discretion) वापरावयाचे नाही.**

संदर्भाधीन शासन निर्णयातील सूचनांनुसार तालुकास्तरावरुन प्रस्ताव जिल्हास्तर समितीकडे व जिल्हा स्तरावरुन प्रस्ताव विभागस्तर समितीकडे व त्यानंतर राज्यस्तरावर विहित केलेल्या कालमर्यादेत पाठवणे आवश्यक आहे.

**<u>बक्षिस योजनेसाठी पंचायत राज संस्था निवडीचे प्रस्ताव पाठविण्यासाठी कालमर्यादा</u>**

| अ.क्र. | पंचायत राज संस्था | मूल्यमापन करणारी संस्था | मूल्यमापन/निवड प्रस्ताव जिल्हा परिषदेकडे सादर करण्याची अंतिम तारीख | जिल्हा परिषदेने मूल्यमापन/निवड प्रस्ताव विभागीय आयुक्तांकडे सादर करण्याची अंतिम तारीख | मूल्यमापन/ निवड प्रस्ताव विभागीय आयुक्तांनी राज्य शासनाकडे सादर करण्याची तारीख |
|---|---|---|---|---|---|
| १ | ग्रामपंचायत | पंचायत समिती | १०-१२-२०१० | ३१-१२-२०१० | २०-०१-२०१० |
| २ | पंचायत समिती | जिल्हा परिषद | १०-१२-२०१० | ३१-१२-२०१० | २०-०१-२०१० |
| ३ | जिल्हा परिषद | विभागीय आयुक्त | | ३१-१२-२०१० | २०-०१-२०१० |

ग्रामपंचायत, पंचायत समिती व जिल्हा परिषद या सर्व स्तरांवरुन मूल्यमापनाचे अहवाल कालमर्यादेचे भान ठेवन विभागीय आयुक्तांमार्फत राज्य शासनास सादर होतील याची जबाबदारी उप आयुक्त (विकास) यांची

वैयक्तिकरीत्या राहील. उप आयुक्त (विकास) यांनी याबाबत मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांच्याशी समन्वय ठेवून कार्यवाही करावयाची आहे.

**अहवालाची क्षेत्रीय तपासणी :**

विभागस्तर मूल्यमापन समितीने क्षेत्रीय भेटी देऊन त्यांच्या विभागात गुणानुक्रमाने क्रमवारीसाठी पात्र ठरलेल्या ग्रामपंचायती, पंचायत समित्या व जिल्हा परिषदा यांच्या अहवालातील माहितीची स्वैर पध्दतीने प्रत्यक्ष खात्री करावी, असा निर्णय शासनाने घेतला आहे. यानुसार विभागीय समिती ही ग्रामपंचायत, पंचायत समिती व जिल्हा परिषद यांच्या अहवालाची प्रत्यक्ष भेटी देऊन खात्री करील. या संदर्भात क्षेत्रीय भेटीमध्ये निदर्शनास आलेल्या बाबीसंदर्भात स्पष्ट अभिप्रायासह अहवाल राज्य शासनास सादर करील. विभागीय आयुक्तांकडून राज्यस्तरावर प्राप्त झालेल्या अहवालातील माहितीची आवश्यकतेनुसार स्वैर पडताळणी (Random Verification) राज्यस्तर समितीकडून केली जाईल.

**वैशिष्ट्यपूर्ण कामाची टिप्पणी पाठविणे :**

जिल्हयातील प्रथम क्रमांकासाठी प्राप्त ठरलेल्या ग्रामपंचायत, पंचायत समिती यांच्या संदर्भात संस्थेची प्राथमिक माहिती व वैशिष्टयपूर्ण कामाची संक्षिप्त टिप्पणी तयार करुन मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी निवडक छायाचित्रासह विभागीय आयुक्तांकडे पाठवावी. विभागीय आयुक्तांनी विभागातील प्रथम क्रमांकाची ग्रामपंचायत, पंचायत समिती व जिल्हा परिषद यांच्याबाबत संस्थेची प्राथमिक माहिती व वैशिष्टयपूर्ण कामाची संक्षिप्त टिप्पणी राज्य शासनाकडे पाठवावी. या माहितीच्या आधारे बक्षिस वितरण समारंभाच्यावेळी संबंधित संस्थेच्या कामाबाबत चित्रफीतीच्या सहाय्याने प्रस्तावना करणे सुलभ होईल.

वरील सर्व सूचनांचे काटेकोरपणे पालन व्हावे.

राज्यस्तरावरील पारितोषिक निवड समिती विभागस्तरीय पारितोषिक निवड समित्यांकडून प्राप्त झालेल्या निवड प्रस्तावावर अभ्यास करुन विभागस्तरीय समितीने निवडलेल्या ग्रामपंचायत, पंचायत समिती व जिल्हा परिषदांमधून राज्यातून प्रथम, द्वितीय व तृतीय पुरस्कारासाठी फक्त **तीन ग्रामपंचायती, तीन पंचायत समित्या व तीन जिल्हा परिषदा** यांची मा.मंत्री (ग्राम विकास) यांच्या सहमतीने अंतिम निवड करेल. अंतिम निवड केलेल्या ग्रामपंचायती, पंचायत समित्या व जिल्हा परिषदांना राज्यस्तरावर स्व.श्री.यशवंतराव चव्हाण यांच्या जयंतीदिनी दिनांक १२ मार्च, २०११ रोजी बक्षीस वितरण समारंभ आयोजित करुन राज्य व विभागस्तर अशा दोन्ही स्तरांवरील पुरस्कारांचे वितरण केले जाईल.

यासाठी होणारा खर्च मागणी क्रमांक एल-३, २५१५- इतर ग्रामीण विकास कार्यक्रम, १०१- पंचायती राज, ३१-सहाय्यक अनुदाने (०१) (०४) विशेष कार्यक्रम व ग्राम अभियान कार्यक्रमाची अंमलबजावणी करण्यामध्ये उत्कृष्ट काम केल्याबद्दल जिल्हा परिषदांना व पंचायत समित्यांना प्रोत्साहनपर अनुदाने (२५१५ ००६२) या

लेखाशीर्षाखालील तरतूदीमधून भागविण्यात यावा. सदर खर्चाचे नियंत्रण अधिकारी विभागीय आयुक्त, कोकण विभाग हे राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक 201001192010037001 असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सुधीर ठाकरे
शासनाचे सचिव

प्रति,

१) मा. मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव.
२) मा. राज्यमंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव.
३) मा. अध्यक्ष, जिल्हा परिषद (सर्व) (मुख्य कार्यकारी अधिकारी मार्फत)
४) मा. विधानसभा/ मा. विधानपरिषद सदस्य (सर्व)
५) मा.सचिव (ग्राम विकास व पंचायत राज).
६) मा सचिव (जलसंधारण).
७) विभागीय आयुक्त (सर्व).
८) उप सचिव (जलसंधारण).
९) उप सचिव (स्व.ग्रा.स्व.रो.यो.)
१०) उप सचिव (माहिती व तंत्रज्ञान), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व).
१२) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व).
१३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरीक्षा), महाराष्ट्र - १, मुंबई.
१५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरीक्षा), महाराष्ट्र - २, नागपूर.
१६) मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१७) उपमुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा (सर्व).
१८) संचालक, लेखा व कोषागार, मुंबई.
१९) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०) कार्यासन क्र. वित्त-१, वित्त-७, वित्त-८, पंरा-९, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१) पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, कार्यासन क्र.पापु-१६, मंत्रालय, मुंबई.
२२) निवड नस्ती, कार्यासन क्र.पंरा-१, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.

# यशवंत पंचायत राज अभियान २०१०-२०११

## कामगिरीच्या मूल्यमापनाचे निकष व त्या अनुषंगाने द्यावयाचे गुण

**(सन २००९-२०१० या वर्षीच्या कामगिरीवरुन मूल्यमापन करावे.)** **जिल्हा परिषद**

| अ.क्र. | विषय | | | कमाल गुण | अनुज्ञेय गुण |
|---|---|---|---|---|---|
| **१** | **पंचायत राज संस्था उपकर/वाढीव उपकर उत्पन्न वाढीसाठी व वसुलीसाठी केलेले प्रयत्न यामध्ये घरपट्टी, पाणीपट्टी इत्यादी करांचा समावेश राहील.** | | | **१०** | |
| १.१ | कायद्यातील तरतुदीनुसार जिल्हा परिषदेने वाढीव उपकर रुपये 5 मूळ उपकर रुपये 2 प्रमाणे आकारणी केली असल्यास (होय पूर्ण गुण, अन्यथा 0 गुण) | | | २ | |
| १.२ | जिल्हा परिषदेने इतर कर किंवा फी आकारणी केली असल्यास- (होय पूर्ण गुण, अन्यथा 0 गुण) | | | १ | |
| १.२.१ | कराची इतर मागणी | वसुली | टक्केवारी | १ | |
| | | | | | |
| १.३ | जिल्हा परिषदेने (बांधा -वापरा-हस्तांतरित तत्वावर) प्रस्ताव तयार करून त्यास अहवाल वर्षात मंजूरी मिळाली असल्यास - (होय पूर्ण गुण, अन्यथा 0 गुण) | | | २ | |
| १.४ | हातपंप, विद्युत पंप व पाणीपट्टी आकारणी / वसुली | | | | |
| | थकबाकीसह मागणी | वसुली | टक्केवारी | १ | |
| | | | | | |
| १.५ | ग्रामपंचायत घरपट्टी (आरोग्यकर व दिवाबत्तीसह) र) | | | | |
| | थकबाकीसह मागणी | वसुली | टक्केवारी | १ | |
| | | | | | |
| १.६ | जिल्हा परिषदेने वाढीव उपकर, मूळ उपकर, इतर कर व फी आकारणी शिवाय स्वतःचे उत्पन्न वाढीसह केलेले प्रयत्न (उदा. विविध साहित्याचे लिलाव, इमारती भाडे, इ.) (मागील वर्षाच्या खर्चाच्या तुलनेत गुण द्यावेत) | | | २ | |
| | गतवर्षीचे उत्पन्न | अहवाल वर्षातील उत्पन्न | उत्पन्नवाढीची टक्केवारी | | |
| | | | | | |
| **२** | **उत्पन्नाचे नियोजन व अर्थसंकल्प-पंचायत राज संस्थेस प्राप्त उत्पन्नाचे योग्य नियोजन करुन आदर्श असा विकासात्मक अर्थसंकल्प तयार करणे.** | | | **५** | |
| २.१ | मागासवर्गीयांच्या कल्याणासाठी केलेला खर्च (20%) | | | १ | |
| | अनुशेषासह तरतूद | खर्च | टक्केवारी | | |
| | | | | | |
| २.२ | अनुशेष शिल्लक नसल्यास (पुर्ण गुण, अन्यथा 0 गुण) | | | १ | |
| २.३ | महिला व बालकल्याणासाठी केलेला खर्च (10%) | | | १ | |
| | तरतूद | खर्च | टक्केवारी | | |
| | | | | | |

**टिप : आवश्यक ठिकाणी टक्केवारीच्या प्रमाणात गुण द्यावेत.**

| अ.क्र. | विषय | | | कमाल गुण | अनुज्ञेय गुण |
|---|---|---|---|---|---|
| २.४ | अपंग कल्याणासाठी केलेला खर्च (3%) | | | १ | |
| | तरतूद | खर्च | टक्केवारी | | |
| | | | | | |
| २.५ | पाणी पुरवठा देखभाल दुरुस्तीसाठी खर्च (20%) | | | १ | |
| | तरतूद | खर्च | टक्केवारी | | |
| | | | | | |
| **३** | **राज्य व केंद्र पुरस्कृत योजनांच्या अंमलबजावणीसाठी उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीतून घेतलेली विकास कामे व उद्दिष्टांच्या अनुषंगाने साध्य.** | | | **२५** | |
| **३.१** | **केंद्र पुरस्कृत योजना** | | | १४ | |
| ३.१.१ | स्वर्ण जयंती ग्राम स्वरोजगार योजना (आर्थिक) | | | | |
| | उद्दिष्ट | साध्य | टक्केवारी | १ | |
| | | | | | |
| | अनुसूचित जाती / जमातीसाठी अर्थसहाय्य | | | | |
| | उद्दिष्ट | साध्य | टक्केवारी | १ | |
| | | | | | |
| | बचत गटांना केलेले अर्थसहाय्य | | | | |
| | उद्दिष्ट | साध्य | टक्केवारी | १ | |
| | | | | | |
| | अपंगासाठी केलेले अर्थसहाय्य | | | | |
| | उद्दिष्ट | साध्य | टक्केवारी | १ | |
| | अल्पसंख्यांकासाठी केलेले अर्थसहाय्य | | | | |
| | उद्दिष्ट | साध्य | टक्केवारी | १ | |
| | | | | | |
| | महिलांसाठी केलेले अर्थसहाय्य | | | | |
| | उद्दिष्ट | साध्य | टक्केवारी | | |
| | | | | १ | |
| | प्रति दा.रे.कुटुंब अर्थसहाय्य मर्यादा | | | | |
| | मर्यादा (किमान) | साध्य | टक्केवारी | ०.५ | |
| | 25000 रुपये | | | | |
| ३.१.२ | केंद्रिय वित्त आयोग | | | | |
| | मागील शिल्लकेसह उपलब्ध निधी | खर्च | टक्केवारी | ०.५ | |
| | | | | | |
| ३.१.३ i) | पंतप्रधान ग्रामसडक योजना (आर्थिक) | | | | |
| | तरतूद | खर्च | टक्केवारी | ०.५ | |
| | | | | | |

**टिप : आवश्यक ठिकाणी टक्केवारीच्या प्रमाणात गुण द्यावेत.**

| अ.क्र. | विषय | | | | कमाल गुण | अनुज्ञेय गुण |
|---|---|---|---|---|---|---|
| (ii) | पंतप्रधान ग्रामसडक योजना (भौतिक) | | | | | |
| | हाती घेतलेली कामे संख्या | पूर्ण कामे संख्या | टक्केवारी | | ०.५ | |
| | | | | | | |
| ३.१.४ | पाणलोट विकास कार्यक्रम (हरियाली व एकात्मिक पडीक जमीन विकास कार्यक्रम) | | | | | |
| | मंजूर प्रकल्प आराखडा निधी | अहवाल वर्षाअखेर आराखडयानुसार अपेक्षित खर्च | प्रत्यक्ष खर्च | टक्केवारी | १ | |
| | | | | | | |
| ३.१.५ | राष्ट्रीय बायोगॅस विकास कार्यक्रम | | | | | |
| | तरतूद | खर्च | टक्केवारी | | १ | |
| | | | | | | |
| ३.१.६ | महाराष्ट्र ग्रामीण रोजगार हमी योजना (ग्रामपंचायत) | | | | | |
| (i) | एकूण ग्रा.पं.ची संख्या | कामे मंजूर केलेल्या ग्रा.पं.ची संख्या | टक्केवारी | | ०.५ | |
| | | | | | | |
| (i i) | एकूण ग्रा.पं.ची संख्या | कामे सुरू केलेल्या ग्रा.पं.ची संख्या | टक्केवारी | | ०.५ | |
| | | | | | | |
| (i i i) | अहवाल वर्षात बेकारी भत्ता प्रदान करण्यात आला आहे काय? (असल्यास 0 गुण, नसल्यास पूर्ण गुण | | | | १ | |
| ३.१.७ | इंदिरा आवास योजना (आर्थिक) | | | | | |
| (i) | उद्दिष्ट | साध्य | टक्केवारी | | १ | |
| | | | | | | |
| (ii) | मागील अपूर्ण घरकुलासह उद्दिष्ट | पूर्ण घरकुले | टक्केवारी | | १ | |
| | | | | | | |
| **३.२** | **राज्य पुरस्कृत योजना :** | | | | ११ | |
| ३.२.२ | तीर्थक्षेत्र विकास योजना | | | | | |
| | प्राप्त अनुदान | पैकी खर्च | टक्केवारी | | १ | |
| | | | | | | |
| ३.२.३ | कुटुंब कल्याण योजना (संतती प्रतिबंधक शस्त्रक्रिया) | | | | | |
| | उद्दिष्ट | साध्य | टक्केवारी | | १ | |
| | | | | | | |
| | दोन अपत्यांचे उद्दिष्ट | साध्य | टक्केवारी | | १ | |
| | | | | | | |

**टिप : आवश्यक ठिकाणी टक्केवारीच्या प्रमाणात गुण द्यावेत.**

| अ.क्र. | विषय | | | कमाल गुण | अनुज्ञेय गुण |
|---|---|---|---|---|---|
| ३.२.४ (i) | पाणी पुरवठा योजना (भारत निर्माण, राष्ट्रीय पेयजल कार्यक्रम, जलस्वराज्य, आपलं पाणी, महाजल इ.) | | | | |
| | एकूण प्राप्त अनुदान | खर्च | टक्केवारी | १ | |
| | | | | | |
| (i i) | अपूर्ण पाणी पुरवठा योजना (१ एप्रिल रोजी) | त्यापैकी पूर्ण केलेल्या पाणी पुरवठा योजना (३१ मार्च अखेर) | टक्केवारी | १ | |
| | | | | | |
| (i i i) | गतवर्षी जिल्हयात टँकरने पाणी पुरवठा केलेल्या गावे/वाडयांची संख्या | अहवाल वर्षी टँकरने पाणी पुरवठा केलेल्या गावे/वाडयांची संख्या | | १ | |
| | गाव / वाडयांच्या संख्येमध्ये वाढ झाल्यास 0 गुण, कमी झाल्यास १ गुण | | | | |
| ३.२.५ | बांधकाम विभाग योजना (सर्व विभागाकडील व सर्व योजनांमधील बांधकामे (उदा.जि.प.सेस, स्थानिक विकास निधी, केंद्र व राज्याच्या योजना, जिल्हा नियोजन समितीच्या निधीतील कामे) | | | | |
| | मागील वर्षाची अपूर्ण बांधकामे (१ एप्रिल रोजी) | त्यापैकी अहवाल वर्षात पूर्ण बांधकामे | टक्केवारी | १ | |
| | | | | | |
| ३.२.६ | मागील वर्षाचे अपूर्ण पाझर तलाव/कोल्हापूरी पध्दतीचे बंधारे/गांवतळी | | | | |
| | एकूण अपूर्ण कामे (१ एप्रिल रोजी) | त्यापैकी अहवाल वर्षात पूर्ण कामे | टक्केवारी | १ | |
| | | | | | |
| ३.२.७ | जवाहर विहीर कार्यक्रम | | | | |
| | १ एप्रिल रोजी अपूर्ण विहिरींची संख्या | अहवाल वर्षात पूर्ण विहिरींची संख्या | टक्केवारी | १ | |
| | | | | | |
| ३.२.८ | दलित वस्ती सुधार योजना | | | १ | |
| | प्राप्त अनुदान | खर्च | टक्केवारी | | |
| | | | | | |

**टिप : आवश्यक ठिकाणी टक्केवारीच्या प्रमाणात गुण द्यावेत.**

| अ.क्र. | विषय | | | कमाल गुण | अनुज्ञेय गुण |
|---|---|---|---|---|---|
| ३.२.९ | जिल्हा परिषदेकडील सर्व विभागातील एकत्रित निधी | | | | |
| | जिल्हा नियोजन समितीने केलेली तरतूद | प्रत्यक्ष प्राप्त तरतूद | टक्केवारी | ०.५ | |
| | | | | | |
| | प्रत्यक्ष प्राप्त तरतूद | खर्च | टक्केवारी | ०.५ | |
| | | | | | |
| **४** | **केंद्र / राज्य पुरस्कृत अभियान कार्यक्रम** | | | **१०** | |
| ४.१ | निर्मल ग्राम योजना | | | | |
| ४.१.१ | जिल्ह्यातील ग्रां.प.ची संख्या | निर्मल ग्राम ग्रा.पं.ची संख्या | टक्केवारी | १ | |
| | | | | | |
| ४.१.२ | जिहयातील एकूण कुटूंब संख्या | पैकी वैयक्तिक शौचालये असलेली कुटुंब संख्या | टक्केवारी | २ | |
| | | | | | |
| ४.२ | सर्व शिक्षा अभियान | | | | |
| ४.२.१ | १ एप्रिल पर्यंत एकूण मंजूर बांधकामे (मागील अपूर्ण कामासह) | त्यापैकी पूर्ण बांधकामे | टक्केवारी | १ | |
| | | | | | |
| ४.२.२ | प्रकल्प आराखडयासह मंजूर अनुदान | त्यापैकी प्राप्त अनुदान | टक्केवारी | ०.५ | |
| | | | | | |
| ४.२.३ | एकूण प्राप्त अनुदान | झालेला खर्च | टक्केवारी | ०.५ | |
| | | | | | |
| ४.३ | कुपोषण निर्मूलन (श्रेणी 3/4 मुक्त असल्यास 2 गुण, श्रेणी 4 मुक्त असल्यास 1 गुण, अन्यथा 0 गुण) | | | २ | |
| ४.३.१ | सर्वेक्षित बालकांची संख्या (० ते ६ वर्षे) | अहवाल वर्षात आरोग्य तपासणी केलेल्या बालकांची संख्या | टक्केवारी | ०.५ | |
| | | | | | |
| | ९०% पेक्षा जास्त असल्यास पूर्ण गुण, अथवा ० गुण | | | | |
| | सर्वेक्षित बालकांची संख्या | वजन केलेल्या बालकांची संख्या | टक्केवारी | ०.५ | |
| | | | | | |
| | ९०% पेक्षा जास्त असल्यास पूर्ण गुण, अथवा ० गुण | | | | |

**टिप : आवश्यक ठिकाणी टक्केवारीच्या प्रमाणात गुण द्यावेत.**

| अ.क्र. | विषय | | | कमाल गुण | अनुज्ञेय गुण |
|---|---|---|---|---|---|
| ४.४ | राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य मिशन | | | | |
| (i) | प्रकल्प आराखडयानुसार मंजूर अनुदान | प्राप्त अनुदान | टक्केवारी | ०.५ | |
| | | | | | |
| (i) | प्राप्त अनुदान | खर्च | टक्केवारी | ०.५ | |
| | | | | | |
| ४.५ | जननी सुरक्षा योजना | | | | |
| | पात्र लाभार्थी | लाभ देण्यात आलेले लाभार्थी | टक्केवारी | १ | |
| | | | | | |
| | | | | | |
| | | | | | |
| **५** | **संस्थेची रचना व कार्यपध्दती - यामध्ये प्रशासनिक / आस्थापना विषयक बाबी, इत्यादींचा समावेश राहील.** | | | **१०** | |
| ५.१ | प्रशासकीय तपासणी शक (विभागीय आयुक्त) | | | | |
| | १ एप्रिल रोजी तपासणी शक | पैकी स्विकृत शक | टक्केवारी | १ | |
| | | | | | |
| ५.१.१ | जिल्हा परिषद मार्फत पंचायत समिती तपासणी | | | | |
| | उद्दिष्ट | साध्य | टक्केवारी | १ | |
| | | | | | |
| ५.२ | प्रलंबित निवृत्ती वेतन प्रकरणे | | | | |
| | वर्षभरात सेवा निवृत्त कर्मचाऱ्यांची संख्या | निपटारा केलेली प्रकरणे | टक्केवारी | १ | |
| | | | | | |
| ५.३ | वर्ग -3/4 ची १ एप्रिल रोजीची सरळ सेवा रिक्त पदे | भरण्यात आलेली पदे | टक्केवारी | १ | |
| | | | | | |
| ५.४ | वर्ग-3/4 ची १ एप्रिल रोजीची पदोन्नती रिक्त पदे | भरण्यात आलेली पदे | टक्केवारी | १ | |
| | | | | | |
| ५.५ | कालबध्द पदोन्नतीसाठी पात्र कर्मचारी | पदोन्नती दिलेले कर्मचारी | टक्केवारी | १ | |
| | | | | | |
| ५.६ | आगाऊ वेतनवाढी देय संवर्ग | आगाऊ वेतनवाढी दिलेले संवर्ग | टक्केवारी | १ | |
| | | | | | |

**टिप : आवश्यक ठिकाणी टक्केवारीच्या प्रमाणात गुण द्यावेत.**

| अ.क्र. | विषय | | | कमाल गुण | अनुज्ञेय गुण |
|---|---|---|---|---|---|
| ५.७ | गोपनीय अहवाल संकलन | | | | |
| | एकूण कर्मचारी | प्राप्त गोपनीय अहवाल | टक्केवारी | १ | |
| | | | | | |
| ५.८ | अभिलेख कक्ष अद्यावत असल्यास (मार्चअखेर) (पूर्ण गुण,अन्यथा 0 गुण) | | | १ | |
| ५.९ | सेवाजेष्ठता याद्या | | | | |
| | जि.प.मधील एकूण संवर्ग (वर्ग 3 व 4) | पैकी अहवाल वर्षात जानेवारी अखेर प्रसिध्द केलेली सेवा जेष्ठता संवर्ग संख्या | टक्केवारी | १ | |
| | | | | | |
| **६** | **कार्य नियमावली व विहित तरतूदी / नियमांच्या कक्षेतील कामकाज** | | | **५** | |
| ६.१ | संवैधानिक समितीच्या बैठका नियमित व गणपूर्तीसह होणे | | | १ | |
| | समिती | अनुज्ञेय बैठका | घेतलेल्या बैठका | | |
| १ | जि.प.सर्वसाधारण सभा | ४ | | | |
| २ | स्थायी समिती | १२ | | | |
| ३ | आरोग्य समिती | १२ | | | |
| ४ | बांधकाम समिती | १२ | | | |
| ५ | कृषि समिती | १२ | | | |
| ६ | अर्थ समिती | १२ | | | |
| ७ | महिला व बाल कल्याण समिती | १२ | | | |
| ८ | समाज कल्याण समिती | १२ | | | |
| ९ | जलसंपदा व पाणी पुरवठा समिती | १२ | | | |
| १० | शिक्षण समिती | १२ | | | |
| ११ | पशुसंवर्धन व दुग्ध विकास समिती | १२ | | | |
| | नियमाप्रमाणे सभा झाल्या असल्यास पूर्ण गुण अन्यथा 0 गुण | | | | |
| ६.१.१ | २६७ अ खाली एखाद्या समितीचा ठराव विभागीय आयुक्तांकडून रद्द झाला असल्यास - (होय 0 गुण, अन्यथा पुर्ण गुण) | | | १ | |
| ६.२ | वरील अनु.क्र. ६.१ पैकी कोणतीही सभा गोंधळ किंवा असभ्य वर्तन यामुळे तहकूब झाली असल्यास 0 गुण, अन्यथा 1 गुण | | | १ | |
| ६.३ | जिल्हा परिषदेचा वार्षिक प्रशासन अहवाल विहित कालमर्यादेमध्ये प्रसिध्द झाल्यास - (होय पुर्ण गुण, अन्यथा 0 गुण) | | | १ | |
| ६.४ | जिल्हा परिषदेने वार्षिक आराखडा विहित कालमर्यादेत मंजूर केला (MREGS/BRGF/ केंद्रीय वित्त आयोग इ.) (होय असल्यास पुर्ण गुण,अन्यथा 0 गुण) | | | १ | |

**टिप : आवश्यक ठिकाणी टक्केवारीच्या प्रमाणात गुण द्यावेत.**

| अ.क्र. | विषय | | | कमाल गुण | अनुज्ञेय गुण |
|---|---|---|---|---|---|
| **७** | **तक्रार निवारण दिन, लोकशाही दिन, इत्यादी मार्फत प्राप्त तक्रारींचे निवारण, मागास वर्गीय कक्ष, महिला अत्याचार इ., लोकप्रतिनिधींशी समन्वय, तारांकित प्रश्न इ.** | | | **७** | |
| ७.१ | तक्रार निवारण व लोकशाही दिनातील | | | | |
| | मागील प्रलंबितसह वर्षभरातील प्रकरण संख्या | निपटारा | टक्केवारी | १ | |
| | | | | | |
| ७.२ | लोकआयुक्त /उप लोकआयुक्त | | | | |
| | प्रकरण संख्या | निपटारा | टक्केवारी | १ | |
| | | | | | |
| ७.३ | लोकप्रतिनिधींशी समन्वय अभाव, मारामारी, असभ्य वर्तन, पोलीस गुन्हा, मु.का.अ.यांच्यावर अविश्वास ठराव-(होय 0गुण,अन्यथा पूर्ण गुण) | | | १ | |
| ७.४ | स्वागत कक्ष/तक्रार निवारण दिन पाळणे(होय पूर्ण गुण, अन्यथा 0 गुण) | | | १ | |
| ७.५ (i) | मागासवर्गीय कक्ष स्थापन केले असल्यास (होय पूर्ण गुण, अन्यथा 0 गुण) | | | ०.५ | |
| (ii) | सभा घेतली असल्यास (होय पूर्ण गुण, अन्यथा 0 गुण) | | | ०.५ | |
| ७.६ | महिला समुपदेशन केंद्र- स्थापन केले असल्यास (होय पूर्ण गुण, अन्यथा 0 गुण) | | | १ | |
| ७.७ (i) | लैंगिक अत्याचार प्रतिबंध समिती स्थापन केली असल्यास (होय पूर्ण गुण, अन्यथा 0 गुण) | | | ०.५ | |
| (ii) | सभा घेतली असल्यास (होय पुर्ण गुण, अन्यथा 0 गुण) | | | ०.५ | |
| **८** | **कार्यालयातील पारदर्शकता- माहितीचा अधिकार इत्यादी बाबतीत नागरिकांना माहिती उपलब्ध करुन देणे.** | | | **३** | |
| ८.१ | प्राप्त अर्जांची संख्या (माहितीच्या अधिकाराखाली) | निपटारा केलेल्या अर्जांची संख्या | टक्केवारी | १ | |
| | | | | | |
| ८.२ | माहितीच्या अधिकारामध्ये माहिती न दिल्यामुळे अपिलीय अधिकाऱ्यांकडे अपील झाले असल्यास | | | | |
| | एकूण अर्जाची संख्या | अपील झालेल्या अर्जांची संख्या | टक्केवारी | १ | |
| | | | | | |
| ८.३ | माहितीच्या अधिकाराचे त्रैमासिक अहवाल मुदतीत सादर केलेले आहेत काय ? अहवाल सादर (जानेवारी, सप्टेंबर, डिसेंबर, मार्च) केले (होय असल्यास पूर्ण गुण, अन्यथा 0 गुण.) | | | १ | |
| **९** | **विशेष कामगिरी- संस्थेने स्वउत्पन्नातून, लोकसहभागातून कार्यान्वित केलेली अभिनव योजना, विकासात्मक प्रकल्प. ( होय असल्यास पूर्ण गुण, अन्यथा 0 गुण)** | | | **६** | |
| (i) | जिल्ह्याचा अपारंपारिक उर्जा विकास आराखडा तयार केला आहे काय? ( होय असल्यास पूर्ण गुण, अन्यथा 0 गुण) | | | १ | |

**टिप : आवश्यक ठिकाणी टक्केवारीच्या प्रमाणात गुण द्यावेत.**

| अ.क्र. | विषय | | | कमाल गुण | अनुज्ञेय गुण |
|---|---|---|---|---|---|
| (ii) | जिल्ह्याचा अपारंपारिक उर्जा स्त्रोत/उर्जा बचतीसाठी जि.प. निधीतून कार्य केले असल्यास ( होय पूर्ण गुण, अन्यथा 0 गुण) | | | १ | |
| (iii) | नाविन्यपुर्ण प्रकल्प मंजूरी (SGSY 15%) | | | १ | |
| (iv) | लोकसहभागातून केलेले विशेष कार्य | | | १ | |
| (v) | इतर नाविन्यपूर्ण प्रकल्प | | | २ | |
| **१०** | **लेखा आक्षेप/ वाहन निर्लेखन/प्रशिक्षण/क्रीडा स्पर्धा** | | | **०९** | |
| १०.१ | स्थानिक निधी लेखा | | | | |
| | एकूण उद्दिष्ट | स्विकृत परिच्छेद | टक्केवारी | २ | |
| | | | | | |
| १०.२ | महालेखापाल | | | | |
| | एकूण उद्दिष्ट | स्विकृत परिच्छेद | टक्केवारी | २ | |
| | | | | | |
| १०.३ | पंचायत राज समिती | | | | |
| | एकूण उद्दिष्ट | स्विकृत परिच्छेद | टक्केवारी | १ | |
| | | | | | |
| १०.४ | जि.प.चे जुने निर्लेखन साहित्य/निर्लेखित वाहन यांचा लिलाव केले असल्यास (होय पूर्ण गुण, अन्यथा 0 गुण) | | | १ | |
| १०.५ | प्रशिक्षण कार्यक्रम घेतले असल्यास (State Action Plan जि.प.निधीमधून) (होय पूर्ण गुण, अन्यथा 0 गुण) | | | | |
| | उद्दिष्ट | साध्य | टक्केवारी | ०.५ | |
| | | | | | |
| | कर्मचारी प्रशिक्षण कार्यक्रम | | | | |
| | उद्दिष्ट | साध्य | टक्केवारी | ०.५ | |
| | | | | | |
| | लोकप्रतिनिधींचे प्रशिक्षण कार्यक्रम | | | १ | |
| | उद्दिष्ट | साध्य | टक्केवारी | | |
| | | | | | |
| १०.६ | कर्मचारी / अधिकारी यांच्या क्रीडा स्पर्धा आयोजित केल्या असल्यास (होय पूर्ण गुण, अन्यथा 0 गुण) | | | ०.५ | |
| १०.७ | कर्मचारी तक्रार समस्या निवारण समितीची बैठक घेतली असल्यास (होय पूर्ण गुण, अन्यथा 0 गुण) | | | ०.५ | |
| **११** | **कार्यालयीन कामाचे संगणकीकरण- ISO प्रमाणकीकरण** | | | **१०** | |
| ११.१ | संगणक वापर (कार्यालयीन काम - 0.5, टपाल- 0.5 गुण) | | | १ | |
| ११.२ | विशेष आज्ञावली विकास (सॉफ्टवेअर) चा वापर (लेखा- 1, योजना- 0.5, आस्थापना- 1, टेंडर- 0.5, इतर- 0.5, रेकॉर्ड- 0.5 गुण) | | | ४ | |
| ११.३ | LAN केले असल्यास (होय पूर्ण गुण, अन्यथा 0 गुण) | | | १ | |

**टिप : आवश्यक ठिकाणी टक्केवारीच्या प्रमाणात गुण द्यावेत.**

